महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,
गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक
संवर्गातील बदल्या / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१६/प्र.क्र.३५३/(१)/सेवा-२**

गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
तारीख: ०६ जानेवारी, २०१७

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४)(दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ, वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६०० मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ. बाबाराव पांडुरंग कदम, वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रुग्णालय, उमरी, जि.नांदेड | जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, नांदेड या रिक्तपदी |

२. संबंधित प्राधिकाऱ्यांनी डॉ.कदम यांना त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे आणि डॉ.कदम यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. डॉ.कदम यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. डॉ.कदम यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. डॉ.कदम हे पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांचेविरुध्द संचालनालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही प्रकारे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१७०१०६१५५२३११५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe518955 6b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2017.01.06 18:10:30 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त (कु.क.) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व),
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई,
६) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व),
७) अधिष्ठाता, डॉ.शंकरराव चव्हाण वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड,
८) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, (सर्व),
९) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
१२) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक
१३) मा. मंत्री (आरोग्य)/ मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१४) मा. अपर मुख्य सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१५) डॉ. बाबाराव पांडुरंग कदम, वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रुग्णालय, उमरी, जि.नांदेड (संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
१६) निवड नस्ती (सेवा - २ )